"महाराष्ट्र अनुसूचित जमातीच्या भोगवटदारांना झाडांची विक्री करणे (विनियमन) अधिनियम, १९६९ या अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) निधी वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२२/प्र.क्र.२१२/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ९ मार्च, २०२३.

वाचा :-

१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४.०४.२०२२
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) यांचे दिनांक २५.०४.२०२२, दिनांक २५.०५.२०२२, दिनांक ३१.०५.२०२२, दिनांक २४.०६.२०२२, दिनांक २७.०७.२०२२, दिनांक २६.०९.२०२२ व दिनांक २२.०२.२०२३.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक ४.०८.२०२२, दिनांक १९.१२.२०२२, दिनांक १५.०२.२०२३ व दिनांक २२.०२.२०२३.

**प्रस्तावना :**

"महाराष्ट्र अनुसुचित जमातीच्या भोगवटदारांना झाडांची विक्री करणे (विनियमन) अधिनियम, १९६९ या अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने (२४०६ ०६८६)" या राज्य योजनेअंतर्गत सन २०२२-२३ साठी एकूण रु. ३००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. सदर योजनांतर्गत आदिवासी खातेदारांना त्यांच्या खाजगी मालकीत झाडाची तोड केल्यानंतर लिलाव होईपर्यंतच्या काळापर्यंत शासनाकडून अग्रिम देण्यात येते. अधिनियमानुसार सदर प्रदाने विहित कालावधीमध्ये देणे आवश्यक आहे. यास्तव या योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीपैकी एकूण रु. **३९९.९८** लक्ष निधीची यवतमाळ, चंद्रपूर, औरंगाबाद, अमरावती, नागपूर व गडचिरोली या वनवृत्तासाठी आवश्यकता असल्याने सदर निधी BDS द्वारे वितरीत करण्याची प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये शासनास विनंती केली आहे.

३. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ च्या परिपत्रकान्वये वित्त वर्ष सन २०२२-२३ करिता अर्थसंकल्पीय तरतूदीची मासिक निधी विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०२२-२३ च्या प्रथम नऊमाहीकरिता (डिसेंबर, २०२२ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत.

त्यानुषंगाने या योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित रु. ३००.०० लक्ष (०२ मजूरी- रु. २१.०० लक्ष व ५० इतर खर्च -रु. २७९.०० लक्ष) निधी पैकी वित्त विभागाच्या अर्थसंकल्पिय प्रणाली नुसार वितरणासाठी उपलब्ध रु. २१५.२५ लक्ष निधी पैकी रु. १८७.३५ लक्ष निधी या विभागाच्या दिनांक ४.०८.२०२२, दिनांक १९.१२.२०२२ दिनांक १५.०२.२०२३ व दिनांक २२.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

सद्य:स्थितीत रु. २७.९० लक्ष निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. सदर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:**

"महाराष्ट्र अनुसूचित जमातीच्या भोगवटदारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम, १९६९ आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) या योजनेअंतर्गत सन **२०२२-२३** करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु. ३००.०० लक्ष निधीपैकी वित्त विभागाद्वारे अर्थसंकल्पिय प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध **एकूण रु. २७.९० लक्ष (०२- मजूरी रु. ०.० लक्ष, ५०- इतर खर्च रु. २७.९० लक्ष)** निधी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना खालील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा.
२) कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.
३) वित्त विभागाने दिनांक ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.
४) सदर मान्यता ही सन २०२२-२३ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.
५) वित्त विभागाने विविध शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.
६) निधी वितरीत करताना प्रस्तुत कामे दुबार होत नसल्याची खातरजमा करावी.

२. सदर खर्च हा मागणी क्रमांक - सी-७, २४०६ वनीकरण व वन्य जीवन ८०० इतर खर्च, (०१) इतर खर्च, (०१) (०५) "महाराष्ट्र अनुसूचित जमातीच्या भोगवटदारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम, १९६९ अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२२-२३ मध्ये मंजूर अर्थसंकल्पित अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे. त्याच प्रमाणे खर्चाच्या अनुषंगाने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल, २०२२ चे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३०९१६३२३९९४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APARNA SUHAS UPASANI

Digitally signed by APARNA SUHAS UPASANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=130a2ee40839d75ff18e93244499097828091ef8e09f856d6e8f0c403254f40a, pseudonym=3697F9C1859177438542B4E103592744309AD950, serialNumber=00DDF81FCF3DFD3E814E1C6D5D5D1249D28D65601EB04EC DFF837C158CB2ED4C, cn=APARNA SUHAS UPASANI
Date: 2023.03.09 16:37:20 +05'30'

**(अपर्णा उपासनी)**
**कार्यासन अधिकारी**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर / गडचिरोली/ यवतमाळ / चंद्रपूर / अमरावती.
५) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
६) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-६ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.